शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे या क्रीडा संकुलाच्या दैनंदिन देखभाल दुरुस्तीच्या खर्चासाठी सन २०२२-२३ साठी निधी मंजूर करुन वितरीत करणेबाबत-लेखाशिर्ष(२२०४-१७०२).

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः क्रीडासु १४२४प्र.क्र ४९//क्रीयुसे-१,

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
तारीखः १३ मार्च, २०२४

**वाचा :-**

१) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे, यांचे क्र.शिक्रीसं/निविप्र/१७०२/२३-२४/का-११/१५८४, दिनांक ७/२/२०२४ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

सन १९९४ मध्ये पुणे येथे आयोजित झालेल्या राष्ट्रीय क्रीडा स्पर्धेच्या निमित्ताने पुणे येथे म्हाळूंगे-बालेवाडी गावानजीक १५१ एकर इतक्या विस्तीर्ण परीसरात शिवछत्रपती क्रीडा नगरीची निर्मिती करण्यात आली आहे. राष्ट्रीय क्रीडा स्पर्धा आयोजनानंतर सदर क्रीडानगरीचा वापर हा राज्यातील विविध स्तरावरील क्रीडा स्पर्धांचे व क्रीडा विषयक उपक्रमांचे आयोजनाकरीता करण्यात येत होता. तिसऱ्या राष्ट्रकुल युवा क्रीडा स्पर्धा सन २००८ च्या निमित्ताने शिवछत्रपती क्रीडा संकुलात असलेल्या विविध आंतरराष्ट्रीय दर्जाच्या क्रीडा सूविधांचे नुतनीकरण करण्यात आले तर कांही सुविधा नव्याने निर्माण करण्यात आलेल्या आहेत. यामध्ये प्रामुख्याने शुटींग, बॅडमिंटन, ॲथलेटिक्स, बॉक्सींग, कुस्ती, टेबल टेनिस, लॉनटेनिस, वेटलिफ्टींग, जलतरण या ९ खेळांच्या सुविधा व स्पोर्टस सायन्स सेंटर, फिटनेस सेंटर व वसतिगृहे या आनुषंगिक सुविधांची निर्मिती करण्यात आलेली आहे. तसेच पूर्वी असलेली कबड्डी, खोखो, वेलोड्रोम, फुटबॉल मैदान इत्यादी १५ प्रकारच्या विविध सुविधा क्रीडा संकुलात आहेत. या सर्व सुविधांचा नियमितपणे वापर होत असल्यामुळे वापरामुळे सदरहू क्रीडा संकुलाच्या दैनंदिन देखभाल व दुरुस्तीबाबत वारंवार खर्च करावा लागतो. या अनुषंगाने संदर्भाधिन क्रीडा वयुवक सेवा संचालनायाच्या पत्रान्वये शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे या क्रीडा संकुलास दैनंदिन देखभाल व दुरुस्तीच्या विविध खर्चांसाठी निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुसार सन २०२३-२४ मधील अर्थसंकल्पीय तरतूदीमधून दैनंदिन देखभाल व दुरुस्तीच्या विविध खर्चांसाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

शिवछत्रपती क्रीडा संकुल, पुणे या क्रीडा संकुलाच्या दैनंदिन देखभाल व दुरुस्तीकरिता संदर्भ क्र.३ येथील दिनांक ३० मार्च, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता दिल्यानुसार मागणी क्र.ई-३, २२०४-क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) क्रीडा संकुल (१६)(०१), क्रीडा संकुलाची स्थापना (कार्यक्रम), (२२०४-१७०२), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), या लेखाशिर्षाखाली

सन २०२३-२४ या वर्षाकरिता सुधारित अंदाजानुसार अर्थसंकल्पीत तरतूदीमधून रु.७०८.३० लक्ष तरतूद वितरीत करण्यास व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०२३-२४ मध्ये क्रीडा विद्यापीठाची स्थापना याकरीता सुधारित अंदाजानुसार अर्थसंकल्पित रु.८७९९.०० लक्ष एवढया तरतुदी मधून उपरोक्त निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च "मागणी क्र.ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) (०१) क्रीडा संकुलांची स्थापना (२२०४ १७०२), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखालील या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

४. वित्त विभाग दिनांक ०४.०३.२०२४ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विअप्र-२०.१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये व विभागांना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.८०/१४७१, दिनांक ९/२/२०२४ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३०५/व्यय-५, दिनांक ४/३/२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे

७.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१३१४५६३२७०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2024.03.13 15:08:23 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल तथा अध्यक्ष, आंतरविद्यापीठ क्रीडा महोत्सव आयोजन समिती, मुंबई.
२. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५. अपर मुख्य सचिव , क्रीडा विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक मुंबई
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, शिवछत्रपती क्रीडा संकुल, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. सर्व जिल्हा कोषाधिकारी (संचालनालयामार्फत)
१०.वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (संचालनालयामार्फत)
११.नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई.
१२.वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
१३.ग्रंथपाल, विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई.
१४.अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रीडा, मंत्रालय, मुंबई.
१५.निवडनस्ती, क्रीयुसे-१.